सन्मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दिवाणी अपील क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका संदर्भातील दिनांक ६ जुलै, २०१७ च्या निर्णयाची महाराष्ट्र राज्य आरोग्य सेवेतील वैद्यकीय अधिकारी, गट-अ ( वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) संदर्भात अंमलबजावणी करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मवैअ-२०२०/प्र.क्र.४१/सेवा-३

१० वा मजला, गो.ते.रुग्णालय,
मुंबई-४०० ००१
दिनांक: १८ फेब्रुवारी, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., शासन निर्णय क्र.बीसीसी-२१८/प्र.क्र.३८/१६-ब, दि.२१.१२.२०१९
२) शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि., शासन निर्णय क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.४४१/सेवा-३, दि.१४.१२.२०१६

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १६-ब यांच्या दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातुन नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदे निर्माण करुन त्या अधिसंख्य पदावर वर्ग करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र

वैद्यकीय व आरोग्य सेवेतील वैद्यकीय अधिकारी, गट-अ या संवर्गाकरीता ९ अधिसंख्य पदे आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

अनुसूचित जमाती प्रवर्गातुन नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, जातवैधता प्रमाणपत्रबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेल्या तसेच जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या वैद्यकीय अधिकारी, गट-अ (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) संवर्गातील सोबत जोडलेल्या विवरणपत्र-अ मधील ९ वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दि.१४.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या ५४५ वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या अधिसंख्य पदांपैकी ९ अधिसंख्य पदावर दि.३१.१२.२०१९ पासून वर्ग करण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पदांबाबत शासन निर्णय क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१ मधील कार्यपद्धतीनुसार वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

३. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकारी तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरीता किंवा ते सेवेत असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यत सदर अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

४. सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमुद केलेल्या अधिकाऱ्यांचे वेतन संचालनालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१८११३७४७६७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Hanmantrao Bhosale

Digitally signed by Satish Hanmantrao Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=814c799b5179dd55944f37ef369de7b98d5d22be413ef2efda9ea389e98444ce, serialNumber=50368303277ad4cc81c8f5dc78f44c79a8908848f662f446ecc012cc85676fc9,
cn=Satish Hanmantrao Bhosale
Date: 2020.02.18 13:03:20 +05'30'

**( स. ह. भोसले )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.

४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, सर्व परिमंडळे

७. जिल्हा शल्यचिकीत्सक, सर्व जिल्हे.

८. निवडनस्ती/सेवा-३.

## विवरणपत्र-अ

| क्र. | नाव | पदनाम व गट-अ | नियुक्ती आदेश दिनांक | बिंदु नामावली नोंदवहीतील बिंदू क्रमांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | शेरा | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | डॉ.नंदा यादवराव शंखपाळे मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | ०१.०२.२००३ | ३४४३ | --- | डॉ.शंखपाळे यांची नामनिर्देशनाने नियुक्ती अनुसूचित जमातीच्या प्रवर्गात झाली असुन त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र जात वैधता समितीने अवैध ठरविलेबाबतचा दावा क्र.३४४३/१९९० मा.उच्च् न्यायालय, औरंगाबाद यांनी खारीज करुन जात वैधता समितीने दिलेला निर्णय योग्य ठरविलेला आहे. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| २ | डॉ.सुरेश शंकरराव चांडोळकर, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | दि.१२.०२.२००९ | २९०२ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ३ | डॉ.वाकदकर उत्तम वैजनाथ, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी,गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | दि.३०.११.२०१५ | ६२०२ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ४ | डॉ.सतिश विठ्ठल तोटावार, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | समावेशन - २००९ | ३१२३ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | डॉ.शिवशंकर विश्वनाथ बुरकुले, मवैआसे, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | १३.०५.२०१५ | ५६६३ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ६ | डॉ.कविता विठ्ठलराव पालेकर, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | समावेशन-२००९ | २८३३ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ७ | डॉ.बालाजी मारोतराव सातमवाड, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | समावेशन-२००९ | १६३ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ८ | डॉ. विरसिंग तुक्या पाडवी, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | २४.१०.१९८७ | आढळुन येत नाही. | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |
| ९ | डॉ.कृष्णा दत्तात्रय कोळी, मवैआसे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ ग्रेड पे-५४०० | वैद्यकीय अधिकारी, गट-अ | १६.१०.१९९५ | ३५९३ | --- | अद्याप जात वैधता प्रमाणपत्र कार्यालयास सादर केलेले नाही. | (वेतन स्तर S-२० : ५६१००-१७७५००) |